# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि ४६/०११८/प्र.क्र. १५/ख

महसूल व वन विभाग
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ३१ डिसेंबर, २०१८

**विषय : गौण खनिज-अमरावती**
सन २०१६-१७ या वर्षाकरिता मौजे टाकरखेडा पूर्णा, ता. चांदुरबाजार या वाळूगटाची रक्कम परत करणेबाबत.
मे. संत भिकाराम ट्रेडर्स तर्फे श्री. राजेश वासुदेवराव भोगे.

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी अमरावती यांना त्यांचे पत्र क्रमांक खनिज/कावि-११०७/२०१७, दि.२१/०९/२०१७, क्र. खनिज/अ.शु.नि/कावि-६५०/२०१८, दि.१६/०७/२०१८ च्या उपरोक्त विषयावरील पत्रांस अनुलक्षून असे कळविण्याचे मला निदेश आहेत की, सन २०१६-१७ करिता मौजे टाकरखेडा पूर्णा, ता. चांदुरबाजार हा वाळूगट मे. संत भिकाराम ट्रेडर्स तर्फे श्री. राजेश वासुदेवराव भोगे यांना सर्वोच्च बोलीने रू.६४,९२,०००/- एवढ्या रकमेस मंजूर करण्यात आला होता.

२. लिलावधारकाने लिलावाची संपुर्ण रक्कमेपैकी रू. २९,५०,०००/- एवढ्या रक्कमेचा भरणा केला व उर्वरीत रकमेचा भरणा न केल्याने जिल्हाधिकारी अमरावती यांनी त्यांना दि.२९/०४/२०१७ व दि.१४/०६/२०१७ रोजीच्या नोटीसीद्वारे उर्वरीत रक्कम भरण्याबाबत कळविण्यात आले होते. तथापि, लिलावधारक यांनी त्यांना हृदयविकाराचा आघात झाल्याने उर्वरित रक्कम भरणे शक्य नसून लिलावाची रक्कम परत करण्याची मागणी केली. यास्तव, शासन निर्णय १२/०३/२०१३ मधील B (३) मधील तरतुदीनुसार लिलावाची १/४ रक्कम रू. १६,२३,०००/- जप्त करण्याचा व त्यांनी शासनजमा केलेली लिलावाची उर्वरित रक्कम रू.१३,२७,०००/- लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. सबब, लिलावधारक मे. संत भिकाराम ट्रेडर्स तर्फे श्री. राजेश वासुदेवराव भोगे यांना रू.१३,२७,०००/- (रुपये तेरा लाख सत्तावीस हजार फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. याबाबीवर होणारा खर्च सन २०१८-१९ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)" खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

५. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८०/२०१८/व्यय-९, दिनांक १७.४.२०१८ अनुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०५१७१९२३९८१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2019.01.05 17:29:04 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
अवर सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी अमरावती, अमरावती

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अमरावती, अमरावती.
५) वित्त विभाग, (व्यय-९,अर्थसंकल्प -३, ६ व १४ कार्यासने) हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
७) निवडनस्ती ख कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.